विद्यमान महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेस मुदतवाढ देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०१८/प्र.क्र.३०३/आरोग्य-६**
गो.ते. रुग्णालय आवार, १०वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई -०१
**दिनांक: १९ जानेवारी, २०१९**

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय, क्र रागांयो-२०१०/प्र.क्र.२४०/आरोग्य-६, दिनांक ३१ मे, २०११
२) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय, क्र. रांगायो-२०१६/प्र.क्र.६४/आरोग्य-६, दिनांक ४ ऑगस्ट, २०१६
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय, क्र. रांगायो-२०१६/प्र.क्र.६४/आरोग्य-६, दिनांक २९ सप्टेंबर, २०१६
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय, क्र.रागांयो-२०१६/प्र.क्र.६४/भाग-१/आरोग्य-६, दिनांक १ डिसेंबर, २०१६
५) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय, क्र. रागांयो-२०१६/प्र.क्र.६४/भाग-१/आरोग्य-६ , दिनांक १३ एप्रिल, २०१७
६) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय,क्र. रांगायो-२०१६/प्र.क्र.६४/भाग-१/आरोग्य-६, दिनांक ३० जून, २०१७
७) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय,क्र. रांगायो-२०१६/प्र.क्र.६४/भाग-१/आरोग्य-६, दिनांक १७ ऑक्टोंबर, २०१७
८) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय,क्र.मफुयो-२०१७/प्र.क्र.२३९/आरोग्य-६, दिनांक १७ जानेवारी, २०१८
९) सार्वजनिक आरोग्य विभाग,शासन निर्णय,क्र.रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २१ सप्टेंबर, २०१८
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी यांचे पत्र क्र.राआहसो/प्रशा/३०३७/भाग चौथा (B)/मुदतवाढ/१५४७/२०१८, दिनांक १७ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

विद्यमान महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेस संदर्भाधिन क्र. ८ येथील दिनांक १७.०१.२०१८ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेली मुदतवाढ दिनांक ३१.१२.२०१८ रोजी संपुष्टात आली आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना संदर्भाधिन क्र.९ येथील दिनांक २१.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील शासकीय रूग्णालयांमध्ये राबविण्यात येत असून सदर योजनेची मुदत दिनांक ३१.१२.२०१८ रोजी संपुष्टात आली आहे. विद्यमान महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेचे प्रधानमंत्री जन आरोग्य

योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना प्रशासकीय बाबी पूर्ण करून एकत्रितपणे राबविण्याची प्रक्रिया प्रगतीत आहे.

सुधारीत महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजना लागू होईपर्यंत किंवा सहा महिने (दिनांक ०१.०१.२०१९ ते दि.३०.०६.२०१९) यापैकी जे आधी होईल त्या कालावधीपर्यंत, विद्यमान महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेस व प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सुधारीत महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या प्रशासकीय बाबी पूर्ण करण्याची प्रक्रिया प्रगतीत आहे. दरम्यानच्या कालावधीत लाभार्थ्यांच्या विमा संरक्षणामध्ये खंड पडू नये, म्हणून सुधारीत महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजना लागू होईपर्यंत किंवा सहा महिने (दिनांक ०१.०१.२०१९ ते दि.३०.०६.२०१९) यापैकी जे आधी होईल त्या कालावधीपर्यंत विद्यमान महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेस व प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेस मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. वरील मुदतवाढीच्या कालावधीपैकी दि.१ जानेवारी, २०१९ ते दि.३१ जानेवारी, २०१९ या कालावधीत दोन्ही योजनेच्या सर्व लाभार्थी घटकांसाठी प्रतिवर्ष प्रतिकुटुंब रुपये ६७६.२० (अक्षरी-सहाशे शहात्तर रूपये वीस पैसे फक्त) या दराने विमा हप्ता विमा कंपनीस अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाने त्यांचा अनौ.संदर्भ क्र. ४२८/२०१८/व्यय-१३, दिनांक ०९.०१.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१९०११९१५१५५२५५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Nivruti Gadge

Digitally signed by Subhash Nivruti Gadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1f74930407346db2703eca69fb25a73a3ba8647d94e4c83579e877eeaa6372e, serialNumber=8aa1f531272224e355732cc20c64b2a014c4d982a276b8f3e7048995acbf1651, cn=Subhash Nivruti Gadge
Date: 2019.01.19 20:37:13 +05'30'

(सु.नि.गाडगे)

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई- २१
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
विभागीय आयुक्त (सर्व)
आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान
मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी,वरळी, मुंबई
उप महासंचालक, आधार (यु.आय.डी), टेलिफॉन एक्चेंज बिल्डींग, कफ परेड, मुंबई
आयुक्त, महानगरपालीका(सर्व)
अतिरीक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
जिल्हाधिकारी(सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद (सर्व)
सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
संचालक (वैद्यकिय), बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई
सहसंचालक/ उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
नियंत्रक, शिधावाटप, मुंबई
जिल्हा पुरवठा अधिकारी (सर्व)
जिल्हा माहिती अधिकारी (सर्व)
नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१३/अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई -३२
अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
भारतीय जनता पक्ष , महाराष्ट्र प्रदेश , वसंतराव भगवान चौक, नरीमन पाईंट , मुंबई-२०
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर मुंबई- २८
इंडीयन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय)समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई
राष्ट्रवादी कॉग्रेस पक्ष, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पाईंट मुंबई- २१
बहुजन समाज पक्ष, डी-१ इन्सा हठमेंट, आझाद मैदान, मुंबई ४०० ००१
भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई ४०० ००४
भारतीय कम्युनिस्ट पक्ष, मार्क्सवादी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई -१३
निवड नस्ती (आरोग्य-६)